महाराष्ट्र व्यवसायकर अधिनियम, १९७५ अन्वये विशिष्ट कालावधीत नाव नोंदणीकरण/नोंदणीकरण करून घेणा-या आणि व्यवसायकराची सर्व थकबाकी/देय रक्कम भरणा करणा-या व्यक्ती, संस्था आणि आस्थापना यांना शास्ती, व्याज, आणि दंडात्मक कार्यवाही [प्रॉसिक्यूशन] यामध्ये सवलत देण्याची योजना [ॲम्नेस्टी स्कीम ].

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
शासन निर्णय क्रमांक-पीटीए-२०९५/प्र.क्र. १२४/कराधान-१.
दिनांक:- ३१ ऑक्टोबर १९९६.

प्रस्तावना:-

महाराष्ट्र व्यवसाय, व्यापार, आजिविका आणि नोक-या यावरील कर अधिनियम, १९७५ [व्यवसायकर कायदा ] अन्वये व्यवसायकर भरण्यास पात्र असलेल्या व्यक्ती, संस्था आणि आस्थापना यांनी विहीत कालावधीत नाव नोंदणीकरण [एनरोलमेंट] अथवा नोंदणीकरण [रजिस्ट्रेशन] करून, घेऊन व्यवसायकर भरणे बंधनकारक आहे. नाव नोंदणीकरण अथवा नोंदणीकरण करण्यास विलंब करणे तसेच व्यवसायकर भरण्यास विलंब करणे आणि कायद्याच्या तरतुदींचा भंग करणे या अपराधासाठी सदर कायद्यामध्ये शास्ती, व्याज आणि दंडात्मक कार्यवाही [प्रॉसिक्यूशन ] करण्याची तरतूद आहे. असे असले तरी अद्यापही अनेक व्यक्ती, संस्था आणि आस्थापना नोंदणीकरण करून न घेता व्यवसायकर चुकवेगिरी करत आहेत, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. अशा दोषी व्यक्ती/संस्था [डिफॉल्टर ] यांना काही प्रोत्साहनपर सवलत दिल्यास संबंधित व्यक्ती/संस्था आणि आस्थापना नोंदणीकरण करून घेण्यास आणि व्यवसायकर भरण्यास उद्युक्त होतील अशी शासनाची धारणा आहे. याद्रुष्टीने संबंधितांना योग्य ती सवलत देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

- शासन निर्णय -

शासन आता असे आदेश देत आहे की, -

१] दिनांक १ नोव्हेंबर १९९६ ते दिनांक ३१ जानेवारी १९९७ या कालावधीत नवीन नाव नोंदणीकरण [एनरोलमेंट] आणि नोंदणीकरण [रजिस्ट्रेशन] करून घेवून देय असलेली व्यवसायकराची सर्व मूळ कर रक्कम भरणा करणा-या अनोंदीत व्यक्ती, संस्था आणि आस्थापना यांना व्यवसायकर कायद्यानुसार लागू होणारी शास्ती आणि व्याज संपूर्णपणे माफ करण्यात यावे. तसेच त्यांच्यावर कोणतीही दंडनीय कार्यवाही [प्रॉसीक्यूशन] करण्यात येऊ नये.

...२

२] दिनांक १ नोव्हेंबर १९९६ पूर्वी व्यवसायकर कायद्यानुसार नावनोंदीत असलेल्या व्यवसायीकांनी/व्यक्तींनी [एनरोल्ड पर्सन] त्यांचेकडे देय असलेल्या व्यवसायकराच्या थकबाकीपैकी संपूर्ण मूळ कर रकमेचा भरणा जर दिनांक १ नोव्हेंबर १९९६ ते दिनांक ३१ जानेवारी १९९७ या कालावधीत केल्यास अशा नावनोंदीत व्यक्तींना/व्यवसायीकांना व्यवसायकर कायद्यानुसार लागू होणारी शास्ती आणि व्याज संपूर्णपणे माफ करण्यात यावे तसेच त्यांच्यावर कायद्यानुसार कोणतीही दंडणीय कार्यवाही [प्रॉसीक्युशन ]करण्यात येवू नये.

३] दिनांक १ नोव्हेंबर १९९६ पूर्वी व्यवसायकर कायद्यानुसार नोंदीत असलेल्या परंतु विवरणपत्रे दाखल न केलेल्या/विवरणपत्राप्रमाणे कर भरणा न केलेल्या मालक/आस्थापना यांनी जर निर्धारणेनुसार देय असलेला अथवा विवरणपत्रे दाखल करून देय झालेल्या व्यवसायकराच्या संपूर्ण मूळ-कर रकमेचा भरणा दिनांक १ नोव्हेंबर १९९६ ते ३१ जानेवारी १९९७ या कालावधीत केल्यास अशा नोंदीत मालक/संस्था/आस्थापना यांना व्यवसायकर कायद्यानुसार लागू होणारी शास्ती आणि व्याज संपूर्णपणे माफ करण्यात यावे. तसेच त्यांच्यावर कायद्यानुसार कोणतीही दंडणीय कार्यवाही [प्रॉसिक्यूशन] करण्यात येवू नये.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ वि.प्र. कुलकर्णी ]
शासनाचे अवर सचिव.

प्रत:- माहितीसाठी व आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित.

१]महालेखापाल [लेखा परीक्षा]-१, महाराष्ट्र, मुंबई.
२]महालेखापाल [लेखा परीक्षा]-२, महाराष्ट्र, नागपूर.
३] संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४] विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, ८ वा मजला, माझगांव, मुंबई-४०००१० [५० प्रती].
५] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६] निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
७] महासंचालक, माहिती व जनसंपर्क, संचालनालय, मुंबई.
८] निवड नस्ती, कराधान-१.